२०१००२२६१९४६४८००१

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने - सहा शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना अनुदान वाटप (तिसरा हप्ता)(डिसेंबर,२००९ ते मार्च,२०१०)

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास व जलसंधारण विभाग

### शासन निर्णय क्रमाक :-अनुग्रा २००९/प्र.क्र.४८ /योजना-४

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दिनाक :- २५ फेब्रुवारी, २०१०.

संदर्भ:- १. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक प्रशिक्षण-२०९३/ प्र.क्र.८४५/०९ दि. १७.०९.१९९३.
२. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४. शासन निर्णय क्रमाक अनुग्रा २००९/प्र.क्र.४८ /योजना-४, दि.२४.४.२००९.
५. शासन निर्णय क्रमाक अनुग्रा २००९/प्र.क्र.४८ /योजना-४, दि.२८.८.२००९

**शासन निर्णय :-**

सन २००९-१० या आर्थिक वर्षाकरीता, मागणी क्र. एल-३, "२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, (२४१५ ०६२ ४) " या लेखाशीर्षाखाली ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म, जि.पुणे,/ कसबाबावडा, कोल्हापूर,/जालना,/ परभणी,/ सिंदेवाही, जि.चंद्रपूर व बुलढाणा या केंद्रांसाठी, वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी अनुक्रमे रुपये २,१९,७७,०००/- व ३०,००,०००/- अशी एकूण मिळून रुपये २,४९,७७,०००/- एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. वेतनेतर बाबींमध्ये प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, पाहुणे व्याख्याता मानधन, भोजन भत्त्यावरील खर्च इत्यादी बाबींचा समावेश होतो.

२. वरील अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या एकूण तरतूदीमधून एप्रिल ते जुलै,२००९ या चार महिन्यांच्या कालावधीतील वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी संबंधित ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना एकूण रुपये ७५,४०,०००/- एवढे अनुदान संदर्भाधीन दिनांक २४.४.२००९ च्या शासन निर्णयान्वये तसेच ऑगस्ट ते नोव्हेंबर, २००९ या चार महिन्यांच्या कालावधीसाठी रुपये १,१६,८४,०००/- एवढे अनुदान संदर्भाधीन दिनांक २८.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात आले आहे.

३.	आता डिसेंबर, २००९ ते मार्च, २०१० या कालावधीतील वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये ५७,५३,०००/- एवढी तरतूद तिस-या हप्त्याच्या स्वरुपात वितरीत करण्यात येत आहे. सदर तरतूद संबंधित विभागीय आयुक्त यांच्या अधीनस्त ठेवण्यात येत असून सदरचा खर्च करण्यास संबंधित ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांचे प्राचार्य यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४.	प्रशिक्षण केंद्रांना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण- ११९८/ प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि. १२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने, सर्व संबंधित उप आयुक्त (आस्था), विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालये यांनी प्रशिक्षण केंद्रास अनुदान अदा करण्याची कार्यवाही कालमर्यादेत करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रांनी खर्च करावा.

५.	विभागीय आयुक्त कार्यालयाने अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबींवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे ही बाब विचारात घेऊन त्यांच्या कार्यालयाचे आदेश निर्गमित करावेत. तसेच आपल्या अधीनस्थ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांकडून करण्यात आलेल्या खर्चाची व उद्दिष्टपूर्तीबाबतची माहिती शासनास दरमहा सादर करावी.

६.	प्रशिक्षण केंद्रांनी या संदर्भात केलेल्या खर्चाची मासिक विवरणपत्रे सर्व संबंधित विभागीय आयुक्त यांना पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यन्त सादर करावीत व अशा सादर केलेल्या मासिक खर्चाची तपासणी विभागीय आयुक्त यांनी करावी. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, प्रशिक्षण कार्यक्रमाचे उद्दिष्ट, प्रशिक्षणार्थीचे उद्दिष्ट व साध्य इ..बाबतचा अहवाल सर्व प्रशिक्षण केंद्रांनी विभागीय आयुक्त व संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, पुणे यांना न चुकता पाठवावा व त्याची प्रत शासनास पाठवावी.

७.	अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबींवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे ही बाब विचारात घेऊन विभागीय आयुक्त कार्यालयाने त्यांच्या कार्यालयाचे आदेश निर्गमित करावेत. मात्र कुठल्याही परिस्थितीत सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच आपल्या अधीनस्थ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांकडून करण्यात आलेल्या खर्चाची व उद्दिष्टपूर्तीबाबतची माहिती शासनास दरमहा सादर करावी.

८.	हा खर्च मागणी क्र.एल-३, "२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र (२४१५ ०६२ ४ ), ३५, सहाय्यक अनुदाने (वेतन ), ३१, सहाय्यक अनुदाने

(वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व तो यावर्षी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यांत यावा. सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्ची पडतो आहे याची दक्षता घेऊन व खर्चाचा ताळमेळ घालून सर्व संबधित विभागीय आयुक्त यांनी याबाबत खातरजमा करुन शासनास कळवावे.

९. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार यथास्थिती महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१, मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहील व हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्रे संपूर्ण मदत/सुविधा पुरवतील.

१०. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग- एक अंतर्गत असलेल्या मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील तरतूदीनूसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५-५-२००९ सोबतच्या परिशिष्टातील अनु.क्र.२७, नियम क्र.१४९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( संजय गांगुर्डे )
कार्यासन अधिकारी

प्रत,
विभागीय आयुक्त, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर (प्रत्येकी २ प्रती)
उप आयुक्त (आस्था) विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे,औरंगाबाद,अमरावती व नागपूर
महालेखापाल,(लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१,मुंबई
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता)महाराष्ट्र-२, नागपूर)
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,बाणेर रोड,पुणे
वित्त विभाग ,कार्यासन क्र. अर्थ-५/व्यय-१५
प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म (पुणे),कसबा बावडा,कोल्हापूर ,जालना,परभणी, सिंदेवाही, जि.चंद्रपूर, बुलढाणा,
कार्यासन क्र.वित्त-१,वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतिसह)
निवड नस्ती का.क्र. योजना-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्रमांक अनुग्रा-२००९/प्र.क्र.४८/योजना-४, दिनांक २५ फेब्रुवारी, २०१० चे सहपत्र

| ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांचे नांव | तिस-या हप्त्याचे प्रस्तावित वितरण ( रुपये हजारात ) | |
|---|---|---|
| | वेतन | वेतनेतर |
| मांजरी फार्म, पुणे | ८४४ | ११६ |
| कोल्हापूर | ८४४ | ११५ |
| जालना | ८४३ | ११५ |
| परभणी | ८४४ | ११५ |
| सिंदेवाही, जिल्हा चंद्रपूर | ८४३ | ११५ |
| बुलढाणा | ८४४ | ११५ |
| एकूण | ५,०६२ | ६९१ |

D:\Grant Release 2009-10/Grant Release Dec 09 to March 2010 6 GTC

## विभागीय आयुक्तनिहाय सहा शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांच्या अनुदान वितरणाचा तपशील

| ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांचे नांव | ( डिसेंबर,०९ ते मार्च, २०१० ) तिस-या हप्त्याचे वितरण ( रुपये हजारात ) | | |
|---|---|---|---|
| | | | |
| | वेतन | वेतनेतर | एकूण |
| **मांजरी फार्म, पुणे** | **८४४** | **११६** | **९६०** |
| **कोल्हापूर** | **८४४** | **११५** | **९६०** |
| **विभागीय आयुक्त, पुणे** 2201000274 | **१,६८८** | **२३१** | **१,९१९** |
| जालना | ८४३ | ११५ | **९५८** |
| परभणी | ८४४ | ११५ | **९५९** |
| **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** 3101000274 | **१,६८७** | **२३०** | **१,९१७** |
| सिंदेवाही, जिल्हा चंद्रपूर | ८४३ | ११५ | **९५८** |
| **विभागीय आयुक्त, नागपूर** 4601000274 | **८४३** | **११५** | **९५८** |
| बुलढाणा | ८४४ | ११५ | **९५९** |
| **विभागीय आयुक्त, अमरावती** 6101000274 | **८४४** | **११५** | **९५९** |